८० वर्षे व त्यावरील निवृत्ती वेतन धारक/कुटुंबनिवृत्तीवेतन धारक यांच्या निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनात दि.०१ एप्रिल, २०१४ पासून १०% वाढ करण्याबाबत.

**कुटुंब निवृत्तीवेतन धारकाकडे वयाचा पुरावा उपलब्ध नसेल तर अवलंबिण्याच्या कार्यपद्धतीबाबत .**

## महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः सेनिवे १०१४/प्र.क्र.२६/सेवा ४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३ मार्च, २०१५.

वाचा -

**१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः सेनिवे १०१४/प्र. क्र.२६/सेवा ४,दिनांक ०९ जून, २०१४**

### शासन परिपत्रक-

८० वर्षे व त्यावरील निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांच्या निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनात दि.०१ एप्रिल, २०१४ पासून १०% वाढ देणेबाबतचे आदेश शासनाने संदर्भाधीन दि.०९ जून, २०१४ च्या शासन निर्णया अन्वये निर्गमित केले आहेत.

२. ज्या कुटुंब निवृत्तीवेतन धारकाकडे अतिरीक्त कुटुंब निवृत्तीवेतनाचा लाभ मिळण्यासाठी आवश्यक असलेला जन्मतारखेचा वैध पुरावा उपलब्ध नसेल अशा प्रकरणी खालील कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा :

१) अधिदान व लेखा अधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी यांनी कुटुंब निवृत्तीवेतनधारकास त्याच्या जन्मतारखेचा पुरावा किंवा जन्मतारखेचा उल्लेख असलेली अधिप्रमाणित (authentic) कागदपत्रे जसे आधार कार्ड किंवा पॅन कार्ड सादर करण्याबाबत अधिकृतरित्या कळवावे.

२) ज्या आधार कार्डवर संपूर्ण जन्मतारखेचा उल्लेख नसून केवळ जन्मवर्षाचा उल्लेख असेल, तर अशा प्रकरणी त्या जन्मवर्षाची ०१ जानेवारी ही संबंधित कुटुंब निवृत्तीवेतनधारकाची जन्मतारीख समजण्यात यावी. उदा. जर कुटुंब निवृत्तीवेतनधारकाने सादर केलेल्या आधार कार्डवरील जन्म वर्ष हे १९२४ असेल, तर अशा प्रकरणी जन्म तारीख दि.०१ जानेवारी, १९२४ ही समजण्यात यावी.

३) अपवादात्मक प्रकरणी कुटूंब निवृत्तीवेतनधारकाकडे आधार कार्ड किंवा पॅन कार्ड उपलब्ध नसल्यास, त्याचे /तिचे ज्या जिल्ह्यामध्ये वास्तव्य आहे, त्या जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकीत्सकाचे वयाचे प्रमाणपत्र त्याने/तिने प्राप्त करावे. अशा प्रकरणी कुटुंब निवृत्तीवेतनधारकास ज्या वर्षी प्रमाणपत्र देण्यात आले आहे, त्या वर्षाच्या ०१ जानेवारीला त्याने / तिने पूर्ण केलेल्या वयाची गणना करण्यात यावी. अशा प्रकरणी त्या वर्षातील ०१ जानेवारी ही कुटुंब निवृत्तीवेतनधारकाची जन्मतारीख समजण्यात यावी. उदा.जिल्हा शल्य चिकीत्सकाच्या प्रमाणपत्रानुसार दि.१५ डिसेंबर,

२०१४ रोजी कुटुंब निवृत्तीवेतन धारकाचे वय ७० वर्षे असेल तर, त्याने / तिने दि.०१ जानेवारी, २०१४ रोजी वयाची ७० वर्षे पूर्ण केली आहेत असे समजण्यात यावे आणि दि.०१ जानेवारी, १९४४ ही त्या कुटुंब निवृत्तीवेतनधारकाची जन्मतारीख असेल. अशा प्रकरणी कुटुंब निवृत्तीवेतनधारकाने जिल्हा शल्य चिकीत्सकाच्या प्रमाणपत्रासह त्याच्या / तिच्या हयात असलेल्या अपत्यांच्या वयाचे दाखले अधिदान व लेखा अधिकारी/ जिल्हा कोषागार अधिकारी यांचेकडे सादर करावे.

कुटुंब निवृत्तीवेतनाधारकाचे वय (जिल्हा शल्य चिकित्सकाच्या प्रमाणपत्रानुसार) व कुटुंब निवृत्तीवेतनधारकाच्या सर्वात मोठया अपत्याचे वय यामध्ये किमान १५ वर्षाचा फरक असल्याची खात्री संबंधित अधिदान व लेखा अधिकारी/ जिल्हा कोषागार अधिकारी यांनी करावी.

३. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांना वरील निर्णय योग्य त्या फेरफारासह लागू राहील.

४. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांनाही लागू राहील.

५. सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३११२९३७२००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.23 12:11:48 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),

२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),

३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),

४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),

५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),

६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),

७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)

८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),

९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),

१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),

११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),

१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),

१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई

१४) राज्यपालांचे सचिव,

१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,

१६) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

१८) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,

२०) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,

२१) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२२) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२३) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

२४) *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद

२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.

२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)

२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२

२८) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.

२९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.

३०) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

३१) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.

३२) मंत्रालयातील सर्व विभाग,

३३) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

३४) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

३५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३६) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष

३७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३८) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

३९) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

४०) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

४१) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),

४२) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४३) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४४) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

४५) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

४६) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

४७) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

४८) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),

४९) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),

५०) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),

५१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)

५२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)

५३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)

५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )

५५) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती)

५६) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )

५७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)

५८) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

५९) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.

10% increase in pension / family pension to Pensioners and Family pensioners aged 80 years and above, from 1st April, 2014 .

**Procedure to be followed in cases of non-availability of proof of age of family pensioner.**

**Government of Maharashtra**

**Finance Department**

**Government Circular No.: PEN 1014/C.R.26/SER-4**

Hutatma Rajguru Chowk, Madam Cama Road

Mantralaya, Mumbai 400 032.

Date:23rd March, 2015.

**Read -**

1. **Government Resolution Finance Department, No. PEN 1014/C.R.26/SER-4, dt.09.06.2014.**

**Circular**

Government has increased the pension / family pension by 10% of the pensioners / family pensioners whose age is 80 years and above, w.e.f. dt.01.04.2014 vide GR dt.09.06.2014 referred above.

2. In cases where the family pensioner does not have a valid certificate of date of birth which is necessary for getting the benefit of enhanced pension, the following procedure shall be followed:

1) The Pay & Accounts Officer (PAO) / District Treasury Officer (DTO) will send a formal intimation to the family pensioner to submit the birth certificate or any other authentic document in which the date of birth of the family pensioner is recorded such as Aadhar card or PAN card.

2) In case the Aadhar card does not show the complete date of birth and shows only the year of birth, in such cases, the date of birth shall be deemed to be the 01st January of the year of birth. For example, if the Aadhar card of the the family pensioner shows that the year of birth is 1924, then the date of birth shall be 1st January, 1924.

3) In exceptional cases, where the family pensioner does not have any Aadhar card or PAN card, then he/she will have to obtain a certificate of age from the District Civil Surgeon of the District in which he/she ordinarily resides. In such cases also, the family pensioner shall be deemed to be have completed those many years on the 01st January of the year of certification. For example, if the certificate of the District Civil Surgeon says that the age of family pensioner is 70 years on 15th Dec, 2014, then the pensioner is deemed to have completed 70 years of age as on 1st January, 2014 and the date of birth of that family pensioner will be 1st January, 1944. In these cases, the family pensioner should also submit the birth certificates of his/her children along with District Civil Surgeon's Certificate to the PAO / DTO. The concerned PAO / DTO shall verify that the difference in the age of family pensioner (as certified by the District Civil Surgeon) and that of his/her eldest child is at least 15 years.

3. Government is also pleased to direct that above decision should mutatis mutandis, apply to family pensioners of Recognized and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and Affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities to whom the pension scheme is made applicable.

4. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decision shall apply to the family pensioners of Zilla Parishads.

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201503231129372005. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.23 12:12:18 +05'30'

**N.B.Ringne**

Deputy Secretary, Government of Maharashtra